# विशाल इंगळे



# अनामिका

काही काही पानं कोरीच बरी असतात. ..

# अनामिका / विशाल इंगळे

**Anamika / Vishal Ingle**



**प्रकाशक**

Marathi Poetry Slam (मनापासून मनापर्यंत. ..!)

http://marathipoetryslam.blogspot.com

ई-मेल : marathipoetryslam@gmail.com

भ्रमणध्वनी क्र. :

१) पियूष वानखडे -(+९१)९९२३२०७९०४

२) विशाल इंगळे - (+९१)७७७६९४३५१६

**प्रकाशन दिनांक**

जुलै ६, २०१६

**मुखपृष्ठ, सजावट व मांडणी**

विशाल इंगळे

# मनोगत

अनामिका. मी आजवर लिहिलेल्या कवितांपैकी १९ निवडक मराठी कवितांचा हा छोटासा कवितासंग्रह. कधीही, कुठेही सहज सुचलेल्या या कविता. त्या त्या क्षणांत झालेल्या या कविता त्या त्या क्षणांच्या साक्षीदार आहे. माझ्या मनाच्या अगदी जवळ असलेल्या या माझ्या कविता. कविता माझा छंद नाही, माझी मैत्रीण आहे. माझीच प्रतिबिंब असलेली. इतर कुणाशीही बोलू न शकणाऱ्या साऱ्याच गोष्टी मी हिला सांगतो. माझ्या साऱ्या प्रश्नांची उत्तरे आधी तिलाच मागतो. एकटं पडलो तर तीच कुशीत घेते. प्रेयसी सारखी ती रागावत नाही, कशाचा हट्ट हि करत नाही. म्हणून माझं प्रेम आहे तिच्यावर.

मी पहिली कविता केली ती महाविद्यालयाच्या वार्षिकांकाकरीता. आमचे मराठीचे प्राध्यापक श्री इटेवाड सर यांच्या "तू बघ नं लिहून, तू लिहू शकतो. .." येथून या सगळ्यांची सुरुवात. माझे प्रिय मित्र राहुल कुकलकर, विक्की (विपुल वर्धे) आणि राहुल चोपडे यांच्या प्रोत्साहनामुळेच मी लिहू शकलो. माझ्या अनेक मित्र-मैत्रिणींनी मला पुढे या प्रवासात मदत केली ती मनापासून मनापर्यंतच्या निमित्ताने. सोशिअल मीडियाच्या माध्यमातून येणाऱ्या मित्रांच्या मार्गदर्शनामुळे कवितेतील चुकांबद्दल, कवितांच्या बारकाव्यांबद्दल हळूहळू कळायला लागलं. अजूनही शिकतच आहे. कवितेच्या वेडापायी अनेक चांगले, जिज्ञासू, अभ्यासक आणि मार्गदर्शक मित्र लाभले त्यासाठी मी कवितेंचाच ऋणी असायला हवं.

शिर्षकाबद्दलही थोडं बोलायला हवं. अनामिका तसं माझ्या बहिणीचं नाव. पण या कवितासंग्रहाला हे शिर्षक देण्यामागचं कारण म्हणजे त्याचा अर्थ. शिर्षक विर्षक शोधणे मला कधी जमलंच नाही, कवितांसाठी सुद्धा. म्हणून अनामिका! या कवितासंग्रहातील साऱ्या कविताही तश्याच निनावी.

ह्या कविता म्हणजे माझ्या आयुष्यातील शब्दांत गुंफलेले काही क्षण. आपल्या मनाला स्पर्शून जातील अशी आशा करतो. मार्गदर्शनाचा लोभ आहे.



"तिच्यावर का नाही करत एखादी कविता?"
एकदा एक मित्र सहज म्हणाला होता. ..!
त्याला काय सांगू, किती वेळ प्रयत्न केला,
तरीही पडला अपुरा शब्दांचा माझ्या पेला. ..
कधी शब्द अपुरे पडले,
कधी सुचलेच नाही काही,
तिच्यावरची कविता कधी पूर्णच झाली नाही. ..
एकदा म्हंट्लं करावा प्रयत्न,
अपूर्ण च का होईना पण तिच्यावर लिहायचा,
हृद्यातल्या नक्षत्राला शब्दांत मांडण्याचा. ..
नक्षत्र? छे. ..!
तिच्या डोळ्यांशी तरी ते बरोबरी करतील का?
बघताच त्यांस कुणी स्वतःलाच भुलतील का?
नक्षत्रांना हे असं भुलविनं जमणार नाही,

वाट्लं हि ही कविता कधी पूर्ण च होणार नाही. ..
वाट्लं हि ही कविता अपूर्ण च राहली,
इतक्यात गॅलरीतली काही खुललेली फुले दिसली. ..
जशी गुलाबाची फुले हि
आली होती बहरून,
फक्त एका स्पर्शानेही तिच्या मन जातं मोहरून. ..
कधीच न कोमेजतील असं उमलणं त्यांना जमेल का?
आयुष्यभर दरवळणारा गंध ते देतील का?
छे, फुलांनाही जमणार नाही हे असं काही,
शब्दांत मांडणे तिला कदाचित जमणार च नाही. ..
दिवस असाच गेला अन रात्र झाली,
कविता होऊन मग ती स्वतःच मजपाशी आली. ..
देवघरातल्या दिव्याची ती वात असावी,
वाटतं कदाचित ती रात असावी. ..
येताना नक्षत्रांची रास घेऊनी येते,
जातानाही डोळयांना नवीन पहाट देवूनी जाते. ..





सरींना पावसाच्या गॅलरीत
फुलांसोबत बोलताना ऐकलं. ..
म्हणे काल त्यांनी तुला
पावसात भिजताना पाहिलं. ..

ऐ खरंच का तू काल
पावसात भिजलीस?
तुला आठवतंय न पहिल्यांदा तू
मला पावसात च भेटलीस?

तुला आठवतंय एकदा भिजल्यावर तू
थंडीने कडकडत होतीस?
आणि मला घट्ट तू
घेतलं होतंस मिठीत?

पावसात च घेतलं होतं न तुझं
पहिल्यांदा चुंबन?
पावसातच भिजलेले आपल्या
शेवटच्या भेटीचे क्षण. ..

सरींना पावसाच्या गॅलरीत
फुलांसोबत बोलताना ऐकलं. ..
म्हणे काल त्यांनी तुला
पावसात भिजताना पाहिलं. ..

तुझं बरं आहे तू
भिजलीस तरी पावसात. ..
तू गेल्यापासून मला तर केलंय
पावसानं ही परकं. ..





नजरेने कळतो म्हणे नजरेचा नेम. ..

बघ तुला दिसतं का माझ्या डोळ्यातलं प्रेम. ..

प्रत्येकच गोष्ट थोडीच वेड्या नजरेनं कळते,

कधी कधी शब्दांत मांडावं हि लागतं. ..

वहितलं हे हि पान कधी कधी उलगडावं लागतं. ..

हे हि बोलावं लागलं तर काय अर्थ आहे?
नजरेने जो कळत नाही न प्रेमात
तो अर्थच व्यर्थ आहे. ..

अर्थ कळला नं तरी ओठांना गप्प रहावं लागतं,
नजरेनेच नजरेला मग उत्तर द्यावं लागतं. ..
नजरेचा होकार मग नजरेलाच कळत नाही,
म्हणून ओठांवर हे हि आणावं लागतं. ..

होकार तर कळला पण बंधनांचं काय?
हृदयाचं ठीक पण स्पंदनांचं काय?

हृदयासोबत घे स्पंदनांनाही सावरून. ..
काही बंधनं तोडणं शक्य नसतं,
बस्स शेवटचं घे मला समजून. ..





काल थंडि खुप होती
गारवा अंगावर काटे आणत होता
हवेचा प्रत्येक स्पर्श तुझी
आठवण करुन देत होता

वाटलं काश तु माझ्यासोबत असतीस
अंगावर तुझी पांघरुण तर असती
ऐवढ्या थंडितहि तुझ्या मिठित ती
रात्र उबदार असती. ..



## क्षणिका



वाटतं वादळ हे हि नाहि विध्वंसक
माझ्या मनाच्या वादळापेक्षा
त्सुनामीही काहिच नाहि
स्वप्नांना वाहुन नेणाऱ्या
आसवांच्या लाटांपेक्षा

माहितेय तु नसणारेय नजरेसमोर आता
डोळेच न उघडावसं वाटतं
खोल तळाशी सागराच्या कोठेतरी
नेहमी करिताच हरवावसं वाटतं

तु गेल्यावर सोडून,
अंधाराशीच झालीय मैत्री
तुझ्याविना आता जगण्यासारखे काहिच नाहि,
वाटतात तुटल्यासारखी
जीवनाशीही नाती

तुझयाविना आता
जगायचं तरी कशासाठी. ..?





आज पुन्हा एकदा तिच्या डोळ्यांवर लिहिलं काही
न दिसावी कुणाला म्हणुनी पुन्हा लपवून ठेवली वही

प्रेम करणे, तिच्यावर लिहिणे म्हणजेच एक गुन्हा
कविता म्हंट्लं म्हणजे तिच्यावर लिहिणे आलंच पुन्हा

शब्दांमागच्या कोवळ्या भावना घेईल का कुणी समजून?
कि गैरसमजच होतील फक्त कविता वाचून?

तिच्या डोळ्यांमधल्या माझ्या ओठांवरचे हसू
तिच्या असण्याने माझी बहरलेली दुनिया, शकेल का त्यांना दिसू?

वारा स्पर्शूनी मज जेव्हा तिच्या बटांशी खेळतो,
सावरता मग ती थोडी हसून लाजते
बिलगतो अलगद जेव्हा तो ती तिच्या ओठांना,
त्या क्षणी ईर्ष्या मज वाऱ्याचीही वाटते

पावसात ती हमखास भिजणार
हात धरून तिच्यासोबत, मलाही पावसात खेचनार
गालावरून तिच्या ओघळतील थेंब जेव्हा,
पुन्हा मला एकदा थेंब व्हावेसे वाटणार

तिच्यासोबत असल्यावर माझे, असणे नसल्यासारखे
दिवसही वाटतात अगदी काही क्षणांसारखे

तिच्यासोबत असताना मी अगदी तिच्याच सारखा वागणार
सारं सारं हे मी माझ्या कवितेत मांडणार

शब्दांमागचं हे सारं सारं त्यांना कळायलाही हवं,
कवितेमधून त्यांनी मला समजायला हि हवं





काल रात्री स्वप्नांत माझ्या चांदोबा आला होता
एकाकिपनाच्या ग्रहनाने पडला काळा होता

म्हणे सारं फक्त दुःख तुलाच नाही
सखिशिवाय एकटा आकाशात आहे मी ही

कहानिची त्याच्या सुरुवात मग झाली
दारू च्या दोन पेग सोबत स्मशानात च बैठक झाली

आयुष्याच्या संगीतातही एक दुःखाचा राग आहे
चंद्र असलो तरी माझ्यावर ही दाग आहे

गरज असली आपली की सारे जवळ येती
म्हणे, आज काल मित्रा सारी अशी च असतात नाती

कुनाशीही जास्त जवळीक साधायची नसते
मैत्री ही आजकाल फक्त कामापुर्ती करायची असते

दगडाच्या देवापुढे मागतो कसली भीक तू?
आयुष्याच्या प्रत्येक प्रसंगातून काहीतरी शिक तू

हृदय बंद पडलं की देहाची लाश होते
काही वेळ का हो ना त्याची चिता ही प्रकाश देते

चितेची करून शेकोटी बसू नको तू बाळ
तुझ्या आयुष्यातही येईल ऊद्या नवी सकाळ





निखार्यांवरही चालण्या इतकं

तुझ्या प्रेमानं बळ दिलंय

हवी हवीशी वाटते प्रत्येक वेदना

मिळालेली या प्रेमाच्या वाटेवर

बस्स श्वास बनुनी तू माझ्यात रहा

हृदयाची स्पंदने बनून जाणीव करून देत रहा

मी जिवंत असल्याची

चांदण्याची दाहकता आणि सुर्याचा ओलावा

काहीच कळत नाही आजकाल

वाटतं जसं मी जगतंच नाही वास्तवात





"नकोत खोटि स्वप्ने

नकोत चंद्र तारे

साथ असेल तुझी

तर झोपडितच ठेव ना रे

महालाची आशा नाहियेय मला

मिठित तुझ्या फक्त जगायंच मला. ..

जगु शकते तुझ्याशिवाय पण मी
पण तुझ्याशिवाय जगणे व्यर्थ आहे
तुझ्यासोबत जगलेल्या प्रत्येक
क्षणाला अर्थ आहे. .."
बोलता बोलताच ती अचानक शांत झाली
पाणावलेल्या डोळ्यांनी आमची नजर एक झाली
"जिथे फक्त आपण दोघंच असु
दुर कुठेतरी घेउन चल मला. ..
असा मला तु छळतोस का रे. ..?"
बोलायला शब्द उरलेच नव्हते
हरवले न जाने शब्द कुठे
ओठांवरचे माझ्या सारे. ..

ऋणालिका





कितीतरी वेळ बसलो होतो मी...

समुद्राच्या किनार्यावर...

एकटाच...

आठवनींच्या सोबत...

क्षितिजाकडे बघत...

भयानक संध्याकाळ होती...

आणि सोबतीला...

थकून...

तुटून...

पडणारा सूर्य...

रडणारा सूर्य...

अश्रूच त्याचे...

जणू समुद्राचे सर्व पाणी...

खारं झालं असेल न जाने...

कितीतरी माझ्यासारख्यांच्या अश्रूंनी...

उचंबळुन येणारी भरती...

आणि परतीस निघालेले पक्षी...

बस्स्स...

एकीकडे क्षितिजावर...
आकाश पृथ्वीचं मिलन होत होतं...
दुसरीकडे मात्र एक पाखरू...
एकटंच तळमळत होतं...
आयुष्यात अंधार पसरवत...
सूर्य ही बुडून गेला...
लाटा शांत झाल्या...
पानी संथ...
उरलो फक्त मी...
आणि माझा एकांत...
वाट बघत राहलो मी...
अख्खी रात्र...
तारे मोजण्याची उगाच थट्टा करत...
कधी ढगाआड दडलेल्या चंद्रासोबत...
तर कधी स्वतः सोबतच बडबडत...
पण...
तू आलीच नाहीस...





येईल न पक्षी परत घरट्याकडे?

अंगणातला गुलमोहर फुलेल न पुन्हा?

समुद्रकिनार्यावर उमटेल

आपल्या दोघांच्या पावलांचे ठसे,

येतील न ते सारे क्षण पुन्हा?

रोज संध्याकाळी दोन चंद्र असतील न?

एक आकाशात,

एक माझ्यासोबत...

चांदण्यांनी गजबजलेलं असेल न आकाश पुन्हा?

दरवळेल न चंदनाचा गंध?

तुझी साद घेवून येईल न हा वारा?

सकाळी सकाळी जाग येईल

पक्ष्यांच्या किलबिलाटीने,

उगवेल न सूर्य आशेची किरने घेवून?

ऋणानिका





खरंच जाणलंस तू मला?
पाणी लपवून पापण्यांखाली
ओठांवर हसू फुलविले मी...
हसणाऱ्या ओठांना सोडून कधी
डोळ्यांत डोळे टाकून बघितलंस?
तुझ्याकडे सरसावनारा हात
तुझ्याच हाताची वाट बघत होता...

वाटलं नाही कधी?

बघावं एकदा हात हातात घेवुन?

गुलमोहराच्या झाडाखाली कितीतरी क्षण

घालविले असतील न आपण...

फुलांनी सांगितलं नाही काहीच कधी?

कितीतरी गोष्टी बोलायच्याच राहून गेल्या...

न बोलता ही कळतं न तुला?

मग हिच गोष्ट का नाही कळली?

तुझ्यापेक्षा ही जास्त चांगल्याने ओळखतो मी तुला,

असं बोलता बोलता बोलून गेलास...

पण चालण्याच्या वेगात

तू जवळुन निघुन गेलास...

आणि मी राहिली एकटीच मागे

चुकून बघशील म्हंटलं वळुन एकदा तरी

पण तू निघून गेलास सरळ

एकदा ही न बघता वळुन

अगदी नजरेआड होईपर्यंत...

खरंच जाणलंस तू मला?







काही काही पानं

कोरीच बरी असतात...

म्हणूनंच पुस्तकातलं

कुठलं न कुठलं पान कोरंच असतं...

मी पण एक पान कोरंच ठेवलं होतं...

मुद्दामच...!

पण आज रहावलंच नाही...

उठलो आणि ओरखडल्या,

आयुष्याच्या कोऱ्या कागदावर

रात्रीतल्या आठवणींच्या सावल्या...!

लिहिल्यावर वाटलं

पान जरा जास्तच काळं झालंय कदाचित...

काही शब्द खोडावी म्हंटलं

आणि ओढल्या उभ्या आडव्या रेषा...!

ऐवढी खोडताड?

आता फक्त पान राहिलंय

फाडून फेकऱ्याच्या लायकिचं...

फाडून गोळा केला आणि दिलं फेकून
कचरापेटीत...
फाटलेलं पुस्तक कोण हाती घेइल?
कोण वाचणार या छिन्नविछिन्न अवस्थेतील
विस्कटलेली कविता...?
देवाजवळच्या दिव्यावर अचानक लक्ष गेलं...
आणि पेटवली चिता
पुस्तकाच्या एक एका पानाची...
आता त्या कोऱ्या पानांवर
कधीच लिहिणार नाही...
सांगणार ही नाही कुणाला
देवघरातल्या कागदाच्या राखेची कहानी...
काही पानं जशी असतात तशीच बरी
असतात...
कोरीच...!
त्या पानावरचे शब्द
फक्त लिहिणाऱ्यासाठी असतात...
पानावर नाही, मनावर कोरलेले...!!!

अनामिका





बस एकच खंत वाटते
तुला समजुच शकलो नाहि मी कधी

तुझ्यामाझ्यामध्ये अबोला नेहमीच दुरी वाटते,
तुझ्यावर केलेली प्रत्येकच कविता अपुरी वाटते;

भाव तुझ्या डोळ्यांमधला
शोधु शकलोच नाहि मी कधी

जेव्हा येतेस समोर खोटेच हसु गालांवर तुझ्या,
डोळे का पाणावलेले असतात तेव्हा तुझे?
प्रश्न नेहमीच पडतो टोचुन जातो मनाला,
का देतेस एकाकीपण मलाहि हे तुझे;

कदाचित मानले नसेलच आपले
मनाने तुझ्या कधी





कधी चैतालीतल्या फुलांचा मोहोर

कधी पानगळीतल्या नीष्पर्ण

गुलमोहरासारखी

कधी पहाटे पाखरांची

किलबिल किलबिल चिवचिवाट

कधी सायंकाळच्या शांत एकांतासारखी

कधी चांदण्यांची सोनेरी किरणे

कधी सागराच्या भरतीसारखी

अशी कशी तू?

मला कळतंच नाही. ..





तुझ्यात आणि माझ्या कवितेत
ऐवढा दुरावा का आहे माहितेय?
मी करू शकतो विश्लेषण
माझ्या प्रत्येक कवितेचं
कवितेतील प्रत्येक ओळीचं
आणि प्रत्येक शब्दाचं सुद्धा
तुला जाणण्याचा वसंता
मी करतोय प्रयत्न फक्त...
मी करू शकतो कविता
एकाकी चंद्रावर
अंधार्या रात्रींवर
पावसांच्या घनदाट सरींवर
ग्रीष्माच्या दाहक सूर्यावर
हिरव्यागार झाडाच्या
वाळलेल्या फक्त एका पानावर
चैतालीच्या पालवीचं रहस्य मात्र
मला कळलंच नाही अजुन...

लिहू शकतो मी
स्मशानाच्या पडक्या भिंतींवर
भिंतींच्या प्रत्येक विटेवर
जळणार्या चितेवर
चितेच्या झालेल्या राखेवर
आणि विझलेल्या दिव्यावर सुद्धा
बघितलीच नाही पण
तुझ्या सकाळी फुलपाखरे
आणि फूललापाखरांचे रंग...
माहित नाही का करतात सर्व
तुझं नेहमीच गुणगान
मला तर असह्य होतो
कोकिळेचा कर्कश आवाज
तोडाविशी वाटतात ही
माझ्यावर हसणारी उद्धट फुले
जमत नाही इतरांसारखं
सुन्दर कल्पनेच्या शुन्यात रमणं
आणि कधीही माझ्याशी
न जुळलेल्या तुझ्यावर लिहिणं...





न जाने का रुसलाय हा पाउस?

तू गेल्यापासून...!

माझ्यापासून दूर च असतो तो

चार हात...

तू गेल्यापासून जमलंच नाही

पावसांत भिजणं...

मी गैलरी त असलो की बरसतो तो

अगदी मनसोक्त...

जशी मातीशी भेट च नव्हती झाली त्याची

कित्येक दिवसांपासून...

पण मी अंगणात आलो की का कोण जाने

पाउस बरसत च नाही...





वाटतं एक दिवस आयुष्य

कारण नसताना घालवावं...

फिरत रहावं असंच उनाडकं

डोंगर रानातून...

चालत रहावं

धाड धाड

कशाचीही पर्वा न करता...

बघावं किती तापतोय सूर्य

रागाच्या भरात...

किती चटके देईल ही माती...

किती ताकद आहे वाऱ्यात...

एक दिवस जगावं

तत्व बित्व सोडून...

एक दिवस बघावं प्रवाहाच्या

उलट्या दिशेनं पोहून...

चन्द्र,सूर्य,वादळ,वारा यांना

कंटाळलोय मी फार...

स्वतःसाठीही एक कविता

करावीशी वाटते यार...





दोन मित्र आम्ही
बस स्टॉप वर होतो उभं
घराकडल्या शेवटच्या
बसची वाट बघत

आज उशीर का होतोय हिला उगाच
कळत नव्हतं
वेळही बिचारी दमली असेल तिचंही
संथच चालणं होतं

नुकत्याच झालेल्या पावसाने
साचलेलं डोबरं

दोन झिपऱ्या मुली त्यात
उड्या होत्या मारत

धावत पळत त्या झिपऱ्या मुली
आमच्याचकडे आल्या
हात करून पुढे
निरागसपणे हसल्या

मळलेले, फाटके कपडे तरीही
ओठांवरती हास्य
मला कळलंच नाही त्यांच्या डोळ्यांमधील
चमकीचं रहस्य

मी खिशात हात टाकला
बघितला खिसा चाचपून
मीही हसलो केविलतेने
फक्त त्यांच्याकडे बघून

यशनेही बघितलं खिश्यात त्याच्या
होते फक्त दोनच नाणे
एक एक त्याने दोघांच्याहि हातांवर ठेवले

हसत हसत मुली गेल्या
पलीकडे पळून
बघितलंही नाही त्यांनी
एकदाही वळून

मी यशकडे बघितलं
एक कटाक्ष टाकून
त्याच्या चेहऱ्यावरही होतं
आलं हास्य खुलून

बस आली, आम्ही चढलो
पहिल्याच सीट वरच्या खिडकी जवळ बसलो
बघून एकमेकांकडे
आम्ही उगाच हसलो

एक छोटी चिमणी तेवढ्यात
बस मध्ये चढली
हात करून पुढे तीही
निरागसतेनेच हसली



“वाटतं एक दिवस आयुष्य
कारण नसताना घालवावं...
फिरत रहावं असंच उनाडकं
डोंगर रानातून...
चालत रहावं
धाड धाड
कशाचीही पर्वा न करता...
बघावं किती तापतोय सूर्य
रागाच्या भरात...
किती चटके देईल ही माती...
किती ताकद आहे वाऱ्यात...
एक दिवस जगावं
तत्व बित्व सोडून...
एक दिवस बघावं प्रवाहाच्या
उलट्या दिशेनं पोहून...
चन्द्र,सूर्य,वादळ,वारा यांना
कंटाळलोय मी फार...
स्वतःसाठीही एक कविता
करावीशी वाटते यार...”

- विशाल इंगळे , अमरावती

Marathi Poetry Slam



मनापासून मनापर्यंत. ..!

http://MarathiPoetrySlam.blogspot.in



# विशाल इंगळे

जन्म : ११ मार्च १९९४ (अमरावती)
संगणकशास्त्र या विषयात पदव्युत्तर शिक्षण.
कवितालेखन आणि वाचनाचा छंद.
जून २०१४ मध्ये "मनापासून मनापर्यंत. ..!" या ई-अनियतकालिकेची सुरुवात व सह-संपादन.
२०१५ मध्ये Marathi Poetry Slam ची सुरुवात.
http://anamika-fromtheheart.blogspot.in या ब्लॉगवर नियमित कविता व लघुकथा लेखन.


**O संपर्कासाठी O**

ई-मेल - vishalingle25793@gmail.com
भ्रमणध्वनी क्र. - (+९१)७७७६९४३५१६